## अतिथी संपादक

**अरूण नंदन (नाशिक)**

## संपादक

**सचिन काकडे (मुंबई)**

### सह संपादक

सोनाली घाटपांडे (पुणे)

भारती सरमळकर (मुंबई)

स्वप्ना कोल्हे (नाशिक)

शशिकांत रणवरे (ठाणे)

सारंग भणगे (पुणे)



# संपादकिय :-

"एकांताच्या काठावरती
किती ठेवशील हिशोब क्षणांचे
मुक्त उसळल्या लाटांवरुनी
सोडुन द्यावे रंग मनांचे.."

या आधी भिरकावली
असतील कित्येक पानं ...
काही अर्धवट अक्षरांची
काही अज्ञात संदर्भांची ...
सहज आठवली म्हणुन
काही सावळ्या खुणांनी भरुन
हसता हसता रुसलेले,
काही रुसल्यावर हसलेले !..
काहि अलगद उमटलेले,
काही खोल आत लागलेले
या रंगाचीही पानं..
उधळुन द्यावी गहीवर लाटांवर
एकांत काठावर, गर्दीच्या वाटांवर !...
पुन्हा सगळं विसरावं म्हणून...
पुन्हा सगळं आठवुन...

## नेटाक्षरीचा हा रंग तुमच्यासाठी

- सचिन काकडे ( मुबंई )





# अतिथी संपादकाची ओळख...

मी अरुण नंदन,

मी मुळचा नाशिकचा, सध्या मुंबईत एका आय.टी. कंपनीत महाप्रबंधक या पदावर कार्यरत... जसं जमेल तसा प्रयत्न करतो शब्दांच्या जवळ जाण्याचा....पुर्वी वर्तमानपत्रातुन प्रसिद्ध झालेल्या माझ्या कविता व हल्ली नेट्च्या माध्यमातुन व्यक्त होणा-या कविता , माध्यम बदलली असली तरी निर्मितीप्रक्रिया तीच आहे, उलटपक्षी त्वरित प्रतिक्रिया, अभिप्राय, मार्गदर्शन यामुळे कवितेवर अधिकाधिक संस्करण होत आहे.

अचानकच लक्षात येते अन कळते की आपल्याला मनातले पानात उतरवणे जमते.....

"मळभ मनातल जळमटासारखं लटकतयं , त्यात बुडालेत काही हलकट विचार, कळकट व प्रतिमा, त्या धुवून पुसून स्वच्छ करण्यासाठी मी जगतोय..... मेतकटासारखा " ! अशी स्वत:विषयीची व्याख्या करुन अगदीच बाळसे न धरलेल्या अवस्थेतला हा प्रवास आताशी रांगु लागलाय...कधी सुसाट धावत, कधी कुर्मगतिने तर कधी अगदीच थांबून , पुन्हा थोडं चालून माझं शब्दसख्य सुरु आहे.

घरात होत असणा-या हरिपाठाचे,तसेच अजाणत्या वयात वाचल्या गेलेल्या ग्रंथानीच हे दान माझ्या पारड्यात टाकले असावे......महाविद्यालयीन काळापासून माझ्या भावनांच (अर्थात तिच्याच), काहीस निसर्गाचं,नात्यांच्या गोडव्याचं, सज्जन मनाच्या (त्या काळच्या) सृजन अनुभुतीचं वर्णन करत करतच कविता जन्मली.... अन दरवेळी ती नव्याने जन्मतच राहीली....तिच्यावर सारेच सोपस्कार होत गेले, कालानुरुप बदलही झाले, पण जितकी जवळची ती काल होती , आजही तितकीच निकट आहे हेच आजवरचं साध्य .....!!

अरुण नंदन. ( अतिथी संपादक )

## मन पाकोळ्यागत हलके ...

मन पाकोळ्यागत हलके होउन उडुनी जाते
मन कोकिळकंठी स्वराने हे गीत प्रीतीचे गाते.

मन वादळ वारा मन पाउस सारा.
मन हवा गुलाबी मन नशा शराबी.

मन वा-यावरती झुलते तुझ्या भोवती फिरते.
मन कोकिळकंठी स्वराने हे गीत प्रीतीचे गाते.

मन उन कोवळे मन रुप सावळे.
मन अगाध कोडं मन अनाम ओढ.

मन लेउन पंख दिवाने तुझ्या आकाशी उडते.
मन कोकिळकंठी स्वराने हे गीत प्रीतीचे गाते.

मन श्रावणधारा मन मोर पिसारा.
मन झाड आनंदी मन फुल सुगंधी.

मन इन्द्रधनू सतरंगी रंगात रंगुनी जाते
मन कोकिळकंठी स्वराने हे गीत प्रीतीचे गाते.

मन थरथरणारे मन भिरभिरणारे.
मन दीस सुगीचा मन चांद नभीचा.

मन चकोर पाउसवेडे तुझ्या चांदणी न्हाते.
मन कोकिळकंठी स्वराने हे गीत प्रीतीचे गाते.

मन रेशीम धागे... मन अखंड जागे.
मन धुंद तराणे मन वेडे शहाणे.

मन रडतानाही हसते तुझ्याचसाठी झुरते.
मन कोकिळकंठी स्वराने हे गीत प्रीतीचे गाते.

-अरुण नंदन (नाशिक)



# अतिथी संपादकाच्या लेखणीतून ...

**रंग मनाचे !...**

असलेल्याची जाणीव अन नसलेल्याची उणीव सांगत, अनेकविध रंगांमध्ये रंगणारे सर्वसमावेशक , बहुरंगी असणारे मन माझ्या मते फक्त दोनच रंग जगत असतं, एक हवाहवासा, आणि दुसरा नको नकोसा.

हत्या हत्याशा रंगात मन सगळच शोधतं, सगळी अनुकुल समीकरणं, सगळेच आशावादी होकार, जे कधी स्फुट , कधी अस्फुट असतात स्वतःशीच ,मन जे सारंच मागतं पदरात पडलेलं, पदरात पडु शकणारं अथवा न पडु शकणारं, ते बुद्धिचे सारेच नियंत्रण डावलून भरकटतं,गुरफ़टतं,फरफटतं, पण तरीही घेतला वसा....च्या धर्तीवर पुन्हा बे एके बे करत हत्याशा रंगात गुंग होऊन जातं.

विवंचनेचा ,प्राक्तनाचा तितकासा आधार नसतानाही सद्सद्विवेक बुद्धीचीच कास पकडणारे, स्पष्ट नाही म्हणता येणारे मन... नकोनकोशा रंगांच सतत लोढणं लादून प्राप्य परिस्थितीचा असंतुष्ट स्विकार करुन सबबीच्या तसेच नशिबाच्या दोषारोपात स्वतःला महान समजणार मन.. काहीसे अगतिक अन तरीही स्वांतःसुखी अर्थात असं  काहीही असले तरी ज्याचा ठाव लागु शकत नाही, कुठल्याच स्थितीत ज्याच्य क्रिया प्रतिक्रियेचा अंदाज लावू शकत नाही ,ज्याला कालमानाच्या कोणत्याच व्याखेत बसवु शकत नाही, अस मन हे जितकं निर्मोही, निरागस, निर्हेतुक तितकच, लोभी, स्वार्थी अन संशयी देखील....

मात्र ज्यांना आपलं अन समोरच्याचं मन कळतं,तरलतेच्या अत्यंत संवेदनशील भावना जोपासता येतात,आपल्या तसेच इतरांच्या भाव विश्वाचे नानविध रंग मुक्त उधळता येतात असा व्यवहारात मिश्र असणारा पण शब्दांचं ऋण मान्य करुन अंशतः / पुर्णतः परत फेड करणारा श्रीमंत गट म्हणजे कवी.....

नेटाक्षरीच्या माध्यमातून मनामनाचा प्रवास नुसताच असेतुहिमाचल नाही तर दाही दिशांच्या मनांवर अधिराज्य गाजवून अजुनही अत्यहातपणे सुरु आहे, नव नवे आयाम प्रस्थपित करणा-या  मनाच्या आसमंतात विखुरलेल्या, मुक्तहस्ते  उधळल्या गेलेल्या या सगळ्याच नावी,निनावी रंगांना सलाम !

अरुण नंदन. ( अतिथी संपादक )

रंग मनाचे

नेटअक्षरी

# रंग मनाचा ...

रंगात रंगलेल्या
आठवात दंगलेल्या
रंगीत मनात
"तु" धुंदलेल्या
नजरेने आत
पाहतेस
खोल खोल जातेस
नाहतेस
त्या स्पर्श गंधलेल्या
ज्योत मंदलेल्या
किरणात आत
ओल ओठात
हासतेस
वेड पांघरल्या नभाशी तू
कसला रंग पुसतेस
अंतरात
गात गात
सुर एक सात-साथ..
रंग रंगात
दंग..स्वप्नात
तू तुझ्यात..अन
तो मनात..
तुझ्याही आणि त्याच्याही.

- मीनल चौगुले



# मन...

मन एक वेडे
न सुटणारे कोडे
घेऊनी स्वप्नांचे घोडे
उधळले चौफ़ेर !!

मन एक फ़ुल
जसे रांगते मुल
लेउनी स्वरांची झूल
पसरले आसमंतात !!

मन एक आग
नायकिणीचा साज़
सोडुनी लोकलाज
भटकले रानोमाळ !!

मन एक खोड
घेउनी सत्याचे वेड
सोडुनी सर्व चाड
उतरले रणांगणात !!

विजयकुमार कणसे (मुंबई)

## मन माकड ...

मन माकड
सैरभैर झालं
हिंडत सुटलं
गावभर ॥

निष्पर्ण गुलमोहर
लालेलाल झाल
काळ विसरला
फुलण्याचा ॥

डोंगरातलं घर
उदास सावलीत
वाट पाहतय
साथीची. ॥

कालचा गाडा
स्मारक झालाय
चित्रापुरता उरलाय
अंश त्याचा ॥

भग्न अवशेष
कुणा वाड्याचे
सांगत होते
गतकाळ ॥

आयुष्याच्या दुकानी
भरला बाजार
चालतो व्यापार
सुख दुःखाचा ॥

मनाचे खेळ
मनाची व्यथा
जगण्याची कथा
मंदावली ॥

- रमेश ठोंबरे (औरंगाबाद)



# मन कावरं बावरं ...

मन कावरं बावरं तुझ्या एका श्वासासाठी
तुझा एक एक शब्द माझी गीता माझी पोथी ...

तुझा हुंकार झंकार जशी सरस्वती वीणा
तुझ्या वाणीचा गोडवा वेणू मधुबन कान्हा ..
तूच पाठराखी माझी तूच माझी आदि शक्ती
मन कावरं बावरं तुझ्या एका श्वासासाठी ॥१॥

डोळे यातना त्याकुळपाणी माझ्या काळजाचं
वाट दिसता दिसेना जसं नभ मळभाचं ..
गळपटलेले पाय शून्य वजाबाकी हाती
मन कावरं बावरं तुझ्या एका श्वासासाठी ॥२॥

असा यल्गार मांडला आकांताने फ़ोडी टाहो
तरारले अश्रू मनी पान्हा पत्थराला लाहो ..
सारा लिलाव मांडला होते नव्हते ते गाठी
मन कावरं बावरं तुझ्या एका श्वासासाठी ॥३॥

- नाम गुम जायेगा ( ठाणे)

# || .. मन वढाय वढाय .. ||

मन वढाय वढाय
करी आभाळाशी गुज
येडावून तेला सांगे
विशाल मी तू रं खुज
मन वढाय वढाय ...

मन उधाण उधाण
तेला ऐल नाही पैल
चार आठवांची लाट
अन श्वास होई ओलं
मन उधाण उधाण ...

मन येडं मन खुळ
दिसा पाही ते सपान
खार खार होता डोळ
सावरून घेई भान
मन येडं मन खुळ ...

मन हळवं हळवं
करी शब्दांशी प्यार
सरे उब दुनियेची
तवा रितं होई सारं
मन हळवं हळवं ...

मन वढाय वढाय
तेला नाही रितभात
आपुल्याच मस्ती मंदी
गप गुमान चालत
मन वढाय वढाय ...

- भारती सरमळकर (मुंबई)

# नुसतंच भिजत पडलेलं मन...

नुसतंच भिजत पडलेलं मन... विचारांत थिजत पडलेलं मन

आभाळाच्या आरपार खेळतं अंगण<br>
किरणांच्या किनारीचं सोनेरी शिंपण<br>
आवेगांच्या लाटा थबकते किनारे<br>
वाळूत भिजत पडलेलं मन

नुसतंच भिजत पडलेलं मन... विचारांत थिजत पडलेलं मन

रोजच्याच क्षितिजावर रोजचे घन<br>
पेशींच्या गराड्यात रोजचच तन<br>
अथांग विश्वात इवलंस अस्तित्व<br>
तरी प्रत्येक श्वासाचं वेगळं आवर्तन

नुसतंच भिजत पडलेलं मन... विचारांत थिजत पडलेलं मन

आस, हत्यास, निरर्थक प्रवास<br>
हवं असण्याचीच इतकी आस<br>
अबोल, घुसमटणारे कित्येक भास<br>
निसटत्या वाळूतले निसटते क्षण

नुसतंच भिजत पडलेलं मन... विचारांत थिजत पडलेलं मन

- दीपा  मट्टीमनी- कुलकर्णी

# मन आंब्याचा मोहोर....!

मन बगळ्यांची माळ, निळ्या नभाच्या प्रांगणी..
मन प्रतिबिंब वेडे, वेड्या तळ्याच्या दर्पणी..

मन इवलेसे फूल, नटे प्राजक्ताची फांदी..
मन मातीचा तो गंध, चढे नभालाही धुंदी..

मन आंब्याचा मोहोर, सुवर्णाचे जणू दान..
मन बसंत बहार, मधुर कोकीळ गान..

मन मोत्याचा तो थेंब, उठे पाण्यात तरंग..
मन पावसाची धार, भिजवील अंग अंग..

मन भूपाळीचा सूर, पहाटेच्या समयीचा..
मन तेवता प्रकाश, गाभा-यातल्या समईचा...

मन विद्युल्लता पात, धरेवर कोपणारा..
मन बरसता मेघ, जलांमृत सांडणारा..

मन कुंकवाची रेघ, भांगामध्ये रेखलेली..
मन मायेची ती काठी, कमरेत वाकलेली..

मन सवाष्ण शृंगार, सुवासिनिचं ते लेणं...
मन चांदणं टिपूर, जणू नक्षत्रांचं देणं...



- प्राजक्ता पटवर्धन

# मन...

मन..पावसाच्या धारा
मन.. झुलवता वारा
मन.. खळाळता झरा
चैतन्याचा..

मन.. स्वप्नांचा पिसारा
मन.. आशेचा निवारा
मन.. हवासा पसारा
आठवांचा !

मन.. आवेग फसवा
मन..लोभाचा वणवा
मन..फुत्कार नागवा
मत्सराचा !

मन.. भावनांचा खेळ
मन.. कातरती वेळ
मन ..पापण्यांचा मेळ
आसवांशी !

मन.. क्रूराहून क्रूर
मन.. ममतेचा पूर
मन.. भीतीचे काहूर
अकल्पित !

मन.. अभंग रामाचा
मन.. नमाज खुदाचा
मन.. शोध अज्ञाताचा
अखंडित !

मन.. कळूनी न कळे
मन.. वळूनी न वळे
मन.. जुमानी न बळे
दुराग्रही !

मन.. विचारांचा साज
मन.. माणसाचा बाज
मन.. अंतरीची गाज
विश्वव्यापी !

- सुमन परब (मुंबई)

# मन चिंब चिंब सरी...

मन चिंब चिंब सरी
नवख्या अवखळ काही
बेधुंद कोसळती
खेळत झिम्मा
घालत फुगडी

मन चिंब चिंब सरी
क्षणात रिमझिम
क्षणात उधाण
अल्लड खेळती कधी
हर्षित झाडांवरी

कधी निसरड्या वाटांवरती
मन चिंब चिंब सरी
बरसता अंगनी
उठे दरवळ दरवळ
धुंद धुंद मंद मंद

ओलावल्या नभी
मन चिंब चिंब सरी
ओल्या नीरमळ कही
होता बरसात
पसरे आल्हाद

कुंद कुंद सांजवेळी
काही ओल्या क्षणी
मन चिंब चिंब सरी
मन चिंब चिंब सरी

- कोमल यादव



# 'ते मन' ..

मनाच्या एका कोप-यात
एक दुजे मन जागे आहे
ते कुणाचे? ठाऊक नाही..

हे मन म्हणतं "पाप कर"
ते मन म्हणतं "थांब क्षणाचा विचार कर"
ऐकावे कुणाचे? ठाऊक नाही

स्वार्थ साधताना मन म्हणतं "सत्याचा खून कर"
ते मन म्हणतं "सारासार विचार कर"
मानावे कुणाचे? ठाऊक नाही

अभिमानाचा बलात्कार होता मन म्हणतं "पुढे जा"
ते मन म्हणतं "थांब चैतन्याचा विचार कर"
खरे कुणाचे? ठाऊक नाही

नैराश्याचे भीकपात्र आल्यावर मन म्हणतं "वाईटपणा घे"
ते मन म्हणतं "जाऊ दे चांगला विचार घे"
कसे वागू? ठाऊक नाही

माणुसकी स्मशानात पुरता मन म्हणतं "आणखी खड्डे खण"
ते मन म्हणतं "आपल्याचसाठी असणार, विचार कर"
कोणत्या मनाचं ऐकू? ठाऊक नाही...
मनाचे कोडे उलगडत नाही...

- प्रिती अ. खेडेकर

## मन ...

मन माकड माकड, त्यात शेपूट वाकडं
पेटवूनही जळेना, असं ओलेतं लाकुड

मन माजलेला बैल, त्यात दावे त्याचे सैल
मन अथांगशी निद्रा, नाही कुठे त्याचा पैल

मन गुहा वाघळाची, त्यात रात्र अवसेची
नाचतात संबंधाच्या, तालावर भुते पाची

मन सापापरी चाले, त्यात पंखही फुटले
काथ्या झाला वस्त्रगाळ, त्याने इतके कुटले

मन बकासूरी भूक, त्यात दुष्काळाचे मूख
मिळाले ते विसरले, जे ना मिळे त्यात सूख

- स्व. अहं ब्रह्मास्मि (पुणे)



# २ पिकली पानं...

( तिच्या सोबत बोलायला आधी वेळ नव्हता ......
आता तिची बोलायची अवस्था नाही...मग बोलतो मनातल्या मनात...तिचा हात हाती घेऊन )

नव्हता दिला वेळ आधी माझाच मला पुरेनासा
चल आता वाटून घेऊ मन हलकं अन
थोड्या फार आशा ...

गम्मत पहिल्या स्पर्शाची
हाताला हात म्हणा मम
तु खट्याळ हात सोडेना..
मी खुणावतोय गप न..!
माझा चिमटा , तुझी उईई.... बाहेर ढोल झांजा ताशा...||
चल आता वाटून घेऊ मन हलकं अन
थोड्या फार आशा||

लग्नानंतरची पहिली सळसळ
अन आठवते पहिली भेंडीभाजी?
काही करपलेल्या थोड्या खापा
काही कच्च्या तशा ||
चल आता वाटून घेऊ मन हलकं अन
थोड्या फार आशा||

आठवतो का गार गार हात
डिसेंबरात धरलेला
थरथरत्या "बघेल न"शब्दासोबत
तोंडामधुन वाफ़ाळला....
कट्टेकरांनी पाहिल्यावर..
तु गोरीमोरी ,मी कसलीय चोरी मला
आणि त्यांचा मिश्किल हशा ||
चल आता वाटून घेऊ मन हलकं अन
थोड्या फार आशा||

आठवत असेल तर विसरुन जा
आपलं पहिलं भांडण
माझा त्रागा उगाच आपला
तुझं भिजल्या चुलीपुढचं रांधणं
मी तेव्हा नुसतेच धरले कान
आता करवुन घेतेस उठा बशा ?
चल आता वाटुन घेऊ मन हलकं अन
मी तेव्हा नुसतेच धरले कान
थोड्या फार आशा ||

आठवतो पावसाळा पहिला..?
खिडकीत चोरुन पाहिलेला
प्रत्येक नव्या पावसासोबत
डबक्यागत साचुन राहिलेला
मी पावसाळ्यात उगाच नोस्टेलजीक होतो
अन तु डबक्यात उड्या घेते छप्पाकशा....||
चल आता वाटुन घेऊ मन हलकं अन
थोड्या फार आशा ||

आठवतो का चहा पहिला
मी म्हणालो मिळेल का अजुन एक कटिंग
तु भिजल्या केसांनी निथळता, माझा सुस्कारा
चष्माभर वाफ़ वाफ़...तु जशी वॉटर पेंटीग
तेव्हा पासुन तुला कळाली २ कप चहाची भाषा..||
चल आता वाटुन घेऊ मन हलकं अन
थोड्या फार आशा ||

आठव बरं माझं पहिलं आजारपण
मिठाच्या पट्ट्या आणि तुझे डोळे रात्रभर भिजलेले
मी सकाळी किंचीत हसता,तुझे हायसे डोळे सुजलेले
विसरायचय तुझ पहिलं आणि 'शेवटचं' आजारपण
तु शांत शांत,मी प्रश्न प्रश्न, मीच मग निरुत्तरसा..||

चल आता वाटुन घेऊ मन हलकं अन
थोड्या फार आशा ||

- प्राजक्त देशमुख ( नाशिक )



# ई-साहित्य प्रतिष्ठान

मराठी रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रतिष्ठानचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह उधाण होतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फुर्त प्रतिसादामुळे नेटाक्षरी लवकरच शतक गाठेल. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८०००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्ट मित्रांना फॉरवर्ड करून त्यांनाही या आनंद यात्रेत सहभागी करून घ्यावे ही विनंती. असे करताना **netaksharee@gmail.com** या आमच्या आयडीचा अंतर्भाव कराल ? मग नंतरचे अंक आम्ही त्यांना पाठवत राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमितपोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

ई -साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-साप्ताहिके

विनोदी मासिक : ई-स्टाप,

ऑडियो ई नियतकालीक अल्बम: स्वरनेटाक्षरी

मुलां साठी : बालनेटाक्षरी

प्रसिद्ध झालेली ई-पुस्तके

टल्लीची शाळा, मकरंदच्या त्रिवेण्या, ग्रेव्हयार्ड लिटरेचर, चार क्षण, तो आणि ती, प्रियेचे अभंग, देशी दारुचे दुकान-३क, ई-शाळा, तो-मी आणि सिगरेट, मोरया, लोकल गोष्टी, मीरा (मराठी अनुवाद), ऑथंब, सावळया मुलीची गाणी, सईची वही, अहं ब्रह्मास्मी.

वरील ई-बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी तसेच
सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा
esahity@gmail.com

नेटाक्षरीचा हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी व
सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा
netaksharee@gmail.com

आता ई-साहित्यची आजवरची सर्व ई-प्रकाशने
उपलब्ध आहेत सी डी मध्ये फक्त ५०/- रुपयांत १११ ई-पुस्तके

**www.esahity.com**